गडचिरोली जिल्ह्यात मलेरिया नियंत्रणासाठी
कार्यगट (Task Force) स्थापन करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः हिनिका-२०१६/प्र.क्र.५०६/आरोग्य-५**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार,
संकुल इमारत, १० वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४०० ००१.
तारीख : १३ जुलै, २०१७

**संदर्भ –**

१) मुख्यमंत्री कार्यालयाचे क्र.CMO/Admin Sec letter/Outward No.६३७/२०१६, दि.२०/१२/२०१६ रोजीचे पत्र.
२) सह संचालक, आरोग्य सेवा (हि.ह.व ज.रो.), पुणे यांचे क्र. संसआसे/किजरो/जि.गडचिरोली/हिवताप नियंत्रण कार्यगट/मसुदा/९२०-२२/१६, दि.०९/०१/२०१७ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना –**

राज्य शासनाचा सार्वजनिक आरोग्य विभाग, सर्च फाऊंडेशन गडचिरोली, नॅशनल इन्सिटीट्यूट फॉर रिसर्च इन ट्रायबल हेल्थ जबलपूर आणि टाटा ट्रस्ट यांच्या संयुक्त विद्यमाने डॉ.अभय बंग, संचालक, सर्च फाऊंडेशन, गडचिरोली यांचे अध्यक्षतेखाली गडचिरोली जिल्ह्यात मलेरिया नियंत्रणासाठी कार्यगट **(Task Force)** स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन शासन पुढील प्रमाणे आदेश देत आहे.

**शासन निर्णय :-**

गडचिरोली जिल्ह्यात मलेरिया नियंत्रणासाठी डॉ. अभय बंग, संस्थापक, सर्च फाऊंडेशन, गडचिरोली यांचे अध्यक्षतेखाली खाली नमूद सदस्य /सदस्य सचिवांचा कार्यगट **(Task Force)** स्थापन करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजुरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | नांव | पदनाम |
|---|---|---|
| १ | डॉ. अभय बंग, संस्थापक, सर्च फाऊंडेशन, गडचिरोली | अध्यक्ष |
| २ | संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई | सह अध्यक्ष |
| ३ | डॉ. सुभाष सांळुखे, माजी आरोग्य महासंचालक | सदस्य |
| ४ | संचालक, राष्ट्रीय आदिवासी आरोग्य संशोधन संस्था, जबलपूर | सदस्य |
| ५ | टाटा ट्रस्ट प्रतिनिधी, टाटा रुग्णालय, परळ, मुंबई. | सदस्य |
| ६ | तज्ञ प्रतिनिधी, राष्ट्रीय किटकजन्य रोग नियंत्रण कार्यक्रम, नवी दिल्ली | सदस्य |
| ७ | किटकशास्त्रज्ञ, राष्ट्रीय विषाणू विज्ञान संस्था, पुणे | सदस्य |
| ८ | आयुक्त तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, महाराष्ट्र यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ९ | सहसंचालक, आरोग्य सेवा (हि.ह. व ज.रो.), पुणे-६ | सदस्य सचिव |

(कृ.मा.प.)

**<u>गडचिरोली जिल्हा मलेरीया नियंत्रण कार्यगटाची (Task Force) कार्ये व उद्दिष्टये :-</u>**

१) गडचिरोली जिल्ह्यातील हिवताप परिस्थितीचा अभ्यास करणे.
२) गडचिरोली जिल्ह्यातील हिवताप परिस्थितीचे विश्लेषण करुन वाढीची कारणे व करावयाच्या प्रतिबंधात्मक व नियंत्रणात्मक उपाययोजना करणे.
३) गडचिरोली जिल्ह्यातील किटकनाशकांची फवारणी, भारीत मच्छरदाणी, आवश्यक मनुष्यबळ या बाबींचे सुयोग्य व्यवस्थापन करणे.
४) स्थानिक भाषेतून प्रभावी आरोग्य शिक्षण देणेसाठी कृती योजना आखणे.
५) औषधांच्या तसेच किटकनाशकांच्या प्रतिरोधाचा अभ्यास करणे.
६) लक्षण विरहीत रुग्ण तसेच लहान बालकांमधील प्लीहा दर यांचा अभ्यास करणे.
७) शेजारील राज्यांतील हिवताप परिस्थितीचा तुलनात्मक अभ्यास करुन त्यानुषंगाने आंतरराज्य सभेचे आयोजन करणे.
८) गडचिरोली जिल्ह्यातील हिवताप रुग्णांचे प्रमाणे ३ वर्षामध्ये कमीत कमी असे राहीत यासाठी आवश्यक त्या सर्व उपाययोजना तयार करणे.

२. सदर कार्यगटाचे सदस्य सचिव, सहसंचालक, आरोग्य सेवा (हि.ह. व ज.रो.), पुणे यांनी अध्यक्षांच्या सूचनेनुसार कार्यगटाच्या अन्य सदस्यांशी संपर्क साधून बैठकांचे आयोजन करणे. तसेच सदर कार्यगटाचा प्रथम अहवाल कार्यगट स्थापन झाल्यावर ३ महिन्याच्या आत करावयाचा आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७१३११११२१५४५१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay R More
Digitally signed by Sanjay R More
DN: CN = Sanjay R More, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2017.07.13 18:10:46 +05'30'

**( सं. रा. मोरे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मंत्रालयीन प्रशासकीय विभागांचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव.
४) सर्व मा. मंत्री /मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
६) सर्व मंत्रालयीन विभाग.

७) डॉ. अभय बंग, संस्थापक, सर्च फाऊंडेशन, गडचिरोली (सदस्य सचिवांमार्फत)
८) डॉ. सुभाष साळंखे, माजी आरोग्य महासंचालक, आरोग्य सेवा (सदस्य सचिवांमार्फत)
९) संचालक, राष्ट्रीय आदिवासी आरोग्य संशोधन संस्था, जबलपूर (सदस्य सचिवांमार्फत)
१०) टाटा ट्रस्ट प्रतिनिधी, टाटा मेमोरिअल रुग्णालय, परळ, मुंबई (सदस्य सचिवांमार्फत)
११) तज्ञ प्रतिनिधी, राष्ट्रीय किटकजन्य रोग नियंत्रण कार्यक्रम, नवी दिल्ली (सदस्य सचिवांमार्फत)
१२) किटकशास्त्रज्ञ, राष्ट्रीय विषाणू विज्ञान संस्था, पुणे. (सदस्य सचिवांमार्फत)
१३) आयुक्त, आरोग्य सेवा तथा प्रकल्प संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
१४) आयुक्त, अन्न व औषध प्रशासन, बांद्रा कुर्ला कॉम्प्लॅक्स, मुंबई.
१५) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१६) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
१७) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
१८) सहसंचालक, आरोग्य सेवा (हि.ह. व ज.रो.), पुणे-१/६,
१९) जिल्हाधिकारी गडचिरोली, गडचिरोली.
२०) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, गडचिरोली.
२१) पोलीस अधीक्षक, गडचिरोली जिल्हा.
२२) जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा सामान्य रुग्णालय, गडचिरोली.
२३) जिल्हा आरोग्य अधिकारी, गडचिरोली जिल्हा.
२४) जिल्हा माहिती अधिकारी, गडचिरोली जिल्हा.
२५) निवडनस्ती (आरोग्य-५).